**विषय :- खाजगी उद्योजकांमार्फत मुंबई व मुंबई उपनगरासभोवती "BOOT" तत्वावर जलप्रवासी वाहतुक सुरू करण्याबाबतच्या प्रकल्पाची उभारणी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाकडुन करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन.

## गृह विभाग.

शासन निर्णय क्रमांक : आयडब्ल्युटी २०९८/सीआर -३१/भाग-३/पीआरटी १.

गृह विभाग,मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२, दिनांक १५.२.०२

वाचा:-शासन निर्णय क्रमांक : आयडब्ल्युटी २०९८/सीआर-३१/पीआरटी-१दिनांक : १४ जून १९९९.

**<u>प्रस्तावना :-</u>**

१.१ मुंबई शहर व मुंबई उपनगर जिल्ह्याच्या परिसरात वाढलेली लोकसंख्या,उद्योगधंद्यातील वाढ व त्या अनुषंगाने रस्ते व रेल्वे वाहतूकीवर पडणारा ताण यामुळे होणारी वाहतूक कोंडी,ध्वनी,वायू प्रदूषण इत्यादी बाबी लक्षात घेऊन शहराभोवती असलेल्या नैसर्गिक जलमार्गाचा वापर प्रवासी वाहतूकीसाठी करणे अत्यंत आवश्यक झाले आहे.

१.२ या पार्श्वभूमीवर मुंबई व मुंबई उपनगरासभोवताली बारमाही जलप्रवासी वाहतूक सुरु करणे आवश्यक झाल्यामुळे खाजगी उद्योजकांमार्फत "बांधा मालकी, वापरा व परत करा" ( BOOT ) या तत्वावर जल प्रवासी वाहतूक सुरू करण्याचा निर्णय घेण्यात आला.सदर निर्णयाच्या अनुषंगाने जलप्रवासी वाहतूकीबाबतचे धोरण निश्चित करणारा शासन निर्णय दिनांक १४ जून, १९९९ रोजी निर्गमित करण्यात आला. सदर प्रकल्प महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडुन राबविण्याचा निर्णय घेण्यात आला.

१.३ सदर निर्णयाच्या अनुषंगाने महसूल व वन विभागाने त्यांच्या दिनांक २२ जुलै, १९९९ च्या शासन निर्णयान्वये नरिमन पॉईंट, वांद्रे, जुहु, वर्सोवा, मार्वे आणि चारकोप येथील जागा जल प्रवासी वाहतूकीसाठी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे हस्तांतरीत करण्याबाबतचा शासन निर्णय निर्गमित केला.

१.४ माहे जुलै १९९८ मध्ये जेव्हा निविदा सुचना प्रसारित केली त्यावेळी या प्रकल्पाबाबत संपूर्ण अभ्यास करण्यात आलेला नव्हता. जलवाहतूक केंद्राकरीता आवश्यक असणारी जागा,जलवाहतुकीचे धोरण,प्रकल्पाचा आढावा, उद्योजकासोबत करावयाचे करारपत्र याबाबत आणि इतर ब-याच महत्वाच्या बाबीबाबत अभ्यास करण्यात आलेला नव्हता. परंतु, निविदा मागवितांना जलप्रवासी वाहतुकीचे धोरण व निकष न ठरविल्यामुळे असे निकष ठरवून तसेच जलप्रवासी वाहतुकीचे शासनाचे स्पष्ट धोरण ठरवून सन १९९८ मध्ये

निविदा सुचनेस प्रतिसाद दिलेल्या निविदाधारकांना उपलब्ध करून देवून त्यांच पाच निविदाधारकांकडुन आर्थिक देकार प्राप्त करण्यात यावेत असा निर्णय दि.११.५.९९ रोजी संपन्न झालेल्या मंत्रीमंडळाच्या बैठकीमध्ये झाला. त्या पाच निविदाधारकांकडुन आर्थिक निविदा प्राप्त करुन घेण्याची प्रक्रिया सध्या अंतिम टप्प्यात आहे.

१.५ प्रकल्पाचे स्वरुप,त्याचे महत्व तसेच त्याची व्याप्ती लक्षात घेता हया प्रकल्पावर निविदा मागवितांना पुरेशा प्रमाणात अभ्यास करणे गरजेचे वाटले. त्यानुसार मे.कछनार कन्सल्टंट यांची नियुक्ती करुन त्यांचेकडून सर्वसाधारण आराखडा तयार करुन घेण्यात आला. प्रकल्प प्रभावीपणे राबविला जावा हयाकरीता तांत्रिक व आर्थिकदृष्टया सक्षम उद्योजकाची निवड होणे तसेच निविदाकारांकडून काही आर्थिक तथा तांत्रिक निकषांची पूर्तता करणे आवश्यक वाटल्याने त्यानुसार महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने मे. क्रिसील ॲडव्हायझरी सर्व्हीसेस लि. या वित्तीय सल्लागार संस्थेची नेमणूक केली.

१.६ या प्रकल्पाचे किमान तांत्रिक व आर्थिक मानके तसेच किमान गरजा निश्चित करुन दिनांक ५ सप्टेंबर,२००१ रोजी निविदा प्रपत्रे सर्व पाचही निविदाधारकांना वितरीत करण्यात आलेली आहेत. पूर्वी निविदा सादर करावयाची अंतिम तारीख दि.१५/१०/२००१ निश्चित करण्यात आलेली होती. परंतु बहुतांश निविदा धारकांनी ही मुदत वाढविण्यात यावी अशी विनंती केल्याने निविदा सादर करण्याची मुदत दि. १५/०२/२००२ पर्यंत वाढविण्यात आली आहे.

**सद्यस्थिती :-**

२. यशस्वी निविदाकारास, केंद्र शासनाच्या पर्यावरण विभागाकडुन ना-हरकत दाखला प्राप्त करणे, जेट्टी बांधणे ,जलयानांची खरेदी करणे या सर्व बाबी विहीत कालमर्यादेमध्ये करावयाच्या आहेत. याअनुषंगाने खाजगी उद्योजकांमार्फत मुंबई व मुंबई उपनगरासभोवती "BOOT" तत्वावर जलप्रवासी वाहतुक सुरू करण्याबाबतच्या प्रकल्पाची उभारणी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाकडुन करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासननिर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णयः-</u>**

३. (अ) खाजगी उद्योजकांमार्फत मुंबई व मुंबई उपनगरासभोवताली "BOOT" तत्वावर जलप्रवासी वाहतुक सुरू करण्याबाबतच्या प्रकल्पाची उभारणी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाकडुन सोबत नमूद सहपत्रातील अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात यावी.

(ब) निविदाकारांकडुन फेरनिविदा मागविण्याची प्रक्रिया महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने सुरू करावी.

(क) शासकीय जमिन उद्योजकांना देण्याबाबतच्या पध्दतीमध्ये महसूल व वन विभागाच्या सल्ल्याने अनुषंगिक सुधारणा करण्याचे अधिकार गृह विभाग ( परिवहन ) यांना राहतील.

(ड) या प्रकरणी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांनी केलेला खर्च हा प्रकल्पाचे कामाचेच अंग असून त्याचा प्रकल्पाचे खर्चात अंतर्भाव करुन मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांना महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाकडून ही रक्कम अदा करण्यात यावी

हे आदेश महसूल व वन विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.२६४, दि.२९ जानेवारी, २००२, नगर विकास विभागाच्या अनौ.संदर्भ क्रमांक ५१, दिनांक ८ फेब्रुवारी, २००२ व वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.सीआर १९९/व्यय-८, दिनांक १४ फेब्रुवारी, २००२ चे सहमतीने काढण्यात आले आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

सही/-
( सुभाष बागवे )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
२. मा.मंत्री ( बंदरे ) यांचे खाजगी सचिव.
३. मा.राज्यमंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव.
४. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य,मुंबई
५.प्रधान सचिव,महसुल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई
६.प्रधान सचिव,नगर विकास, मंत्रालय,मुंबई.
७.प्रधान सचिव,वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई.
८.प्रधान सचिव,नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई.
९.सचिव,पर्यावरण,पर्यावरण विभाग,मंत्रालय,मुंबई.
१०.आयुक्त,महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ.
११.आयुक्त,मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण,वांद्रे(पूर्व),मुंबई-४०००५१.
१२.आयुक्त,बृहन्मुंबई महानगरपालिका,मुंबई.
१३.पोलिस आयुक्त,मुंबई/अतिरीक्त पोलिस आयुक्त ( वाहतूक),मुंबई.
१४.मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ,मुंबई.
१५.व्यवस्थापकीय संचालक,सिडको,मुंबई.
१६.आयुक्त,ठाणे महानगरपालिका,ठाणे.
१७.जिल्हाधिकारी ,मुंबई शहर.
१८.जिल्हाधिकारी,मुंबई उपनगरे.

गृह विभाग, क्रमांक : आयडब्ल्युटी २०९८/सीआर-३१/भाग-३/पीआरटी - १.
दिनांक : १५ जानेवारी २००२ च्या शासन निर्णयाचे
फेब्रुवारी

सहपत्र

(१) सर्वसाधारणपणे शासनाने दि.१४/६/९९ रोजी निश्चित केलेल्या धोरणाच्या अनुषंगाने महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ सदर प्रकल्पाची उभारणी करेल.

(२) सदर प्रकल्प महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडुन महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाकडे प्रकल्प उभारणीसाठी सोपविण्यात आल्यानंतर महाराष्ट्र सागरी मंडळाकडे या प्रकल्पाच्या उभारणी संदर्भात कोणतीही वित्तिय जबाबदारी ( Financial Stakes ) राहणार नाही.

(३) महाराष्ट्र सागरी मंडळाने निविदाकारांकडुन आर्थिक निविदा मागविण्यासाठी निविदा प्रपत्र ( Bid Document ), नकाशे तयार केले आहेत. हे निविदा प्रपत्र व सर्व कागदपत्रे महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाकडे सोपविण्यात येतील व या निविदाप्रपत्रामध्ये बदल करणे अथवा नव्याने निविदाप्रपत्र तयार करण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाची राहील. तसेच हे निविदापत्र तयार करण्यासाठी व इतर अनुषंगिक बाबींसाठी मेरीटाईम बोर्डास आलेला खर्च प्रकल्प कार्यान्वित झाल्यानंतर उद्योजकांकडुन मिळेल. प्रकल्पाबाबतची इतर कागदपत्रे व माहिती उदा. नकाशे, जमीनीबाबतची कागदपत्रे इ. महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड , महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास विनामुल्य उपलब्ध करून देईल.

(४) ज्या पाच निविदाधारकांनी यापूर्वीच निविदा सादर केल्या आहेत त्यांच्याकडुनच नव्याने आर्थिक देकार देण्याबाबत मंत्रिमंडळाने यापूर्वी निर्णय घेतला आहे.

(५) प्राप्त झालेल्या निविदांचे तांत्रिक व आर्थिक मुल्यमापन करण्यासाठी दि.१४ जुलै १९९८ च्या शासननिर्णयाअन्वये प्रधान सचिव ( परिवहन ) यांचे अध्यक्षतेखाली दोन समित्यांची नेमणुक करण्यात आली होती. या समित्या रद्द करून निविदांचे मुल्यमापन करण्याचे अधिकार महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास देण्यात येत आहेत.

(६) निविदाप्रपत्र तयार करणे, निविदाप्रक्रीया पूर्ण करणे, यशस्वी निविदाधारकाची निवड करणे, यशस्वी निविदाधारकाबरोबर करार करणे तसेच कराराप्रमाणे प्रकल्पाची उभारणी करणे ही महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाची जबाबदारी असेल. व सवलतीच्या काळात करारातील तरतुदींचे पालन करण्याबाबतीत महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाची जबाबदारी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ व महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड संयुक्तपणे ठरवतील.

(७) महाराष्ट्र सागरी मंडळ अधिनियम, १९९६ तसेच भारतीय बंदरे अधिनियम, १९०८ अन्वये जलवाहतुकीसंबंधी तसेच बंदरविषयक विविध तरतुदींची अंमलबजावणी ( Regulatory Functions ) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड करील जसे की बंदरावरील सुरक्षा, बंदरवरील माल, प्रवासी तसेच जलयानांची सुरक्षा

( Safety ) बंदरावरील दळणवळण, अग्निशामक व्यवस्था, नौकानयनाचे नियंत्रण व व्यवस्थापन, जलयानांची तपासणी व सर्वेक्षण त्याना विविध परवाने देणे इ.

(८) जमिन :- जलवाहतुक सुरू करण्याच्या दृष्टीने पायाभूत सुविधांची निर्मिती करण्यासाठी आवश्यक असलेली एन.सी.पी.ए. लगत, बांद्रा, जुहु येथील दोन जागा, वर्सोवा, मार्वे, बोरीवली, एरंगल येथील परिशिष्टात दाखविलेली शासकीय जमिन महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाला महसुल व वन विभागाने प्रतिवर्ष रू.१/- या नाममात्र दराने दिर्घ मुदतीकरीता भाडेपट्टीवर देण्यात आली आहे. *सदर जमिन महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडुन महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाला याच सवलतीच्या दराने देण्यात यावी. याला महसुल विभागाने सहमती दर्शविली आहे.*

(९) ही जमीन महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ जलप्रवासी वाहतूक करणा-या उद्योजकांना दि.१४ जुन १९९९ च्या शासन निर्णयाच्या अधिन राहुन आवश्यक त्या अटी व शर्तीवर उपलब्ध करुन देईल.

(१०) वरील पध्दतीने उपलब्ध करुन देण्यात आलेली जमीन उद्योजकाला पायाभूत सुविधांची निर्मिती करण्यासाठी लागणारा निधी उभारण्याकरीता गहाण ठेवण्याची परवानगी राहील व आवश्यक त्या अटी घालून ही परवानगी देण्याबाबतचे अधिकार महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाला राहतील.सवलतीचा कालावधी संपल्यानंतर सदर जमिन महाराष्ट्र सागरी मंडळाकडे परत करणेत येईल.

(११) उद्योजकांकडुन जलवाहतूकीकरिता प्राप्त झालेल्या निविदांचे मूल्यमापन करताना उद्योजक शासकीय जमीनीचे भाडे किती देणार आहे आणि शासकीय व जमीनीच्या सवलतींची किती कालावधीकरिता मागणी करीत आहे हे निकष राहतील.

(१२) प्रवासी सुखसोयीकरिता आवश्यक बाबी उदा. उपहारगृहे, प्रतिक्षालये,पुस्तकांचा स्टॉल, दूरध्वनी केंद्र, वाहतूक नियंत्रण कक्ष, वाहनतळ, सुरक्षा कक्ष इत्यादीसाठी किती जमीनीचा वापर करता येईल याबाबतचे धोरण महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने नगरविकास विभागाचा सल्ला घेऊन ठरवावे. अशारितीने अनुज्ञेय होणारी जमीन उद्योजकाला भाडेपट्टीवर देण्यामुळे मिळणा-या उत्पन्नाबाबतीत वेगळयाने निर्णय घेता येईल.

नगर विकास विभागाच्या परवानगीने अनुज्ञेय ठरलेल्या जमिनीपेक्षा जास्त जमिन उद्योजकास दिली जाणार नाही याबद्दल महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने योग्य ती दक्षता घ्यावी. तसेच उद्योजकांस कोणत्याही परिस्थितीत व्यापारी किंवा औद्योगिक प्रयोजनार्थ या जागांचा वापर करता येणार नाही.

(१३) यशस्वी निविदाकार उद्योजकाला भाडेपट्टीवर देण्यात आलेल्या जमीनींचा उपयोग हा परवानगी दिलेल्या कारणासाठीच उदा. उपहारगृहे, प्रतिक्षालये,पुस्तकांचा स्टॉल, दूरध्वनी केंद्र,वाहतूक नियंत्रण कक्ष, वाहनतळ सुरक्षा कक्ष, अग्निक्षमन व्यवस्था आणि इंधन डेपो इत्यादीकरीताच करता येईल व त्यासाठी ही जागा विकसित करतांना पर्यावरण विभागाची तसेच आवश्यक तेथे मुंबई महानगर पालिकेची संमती अशा उद्योजकाला घ्यावी लागेल.

(१४) जलवाहतूकीचे संदर्भात जलयाने उतरविण्याच्या जागांचा (लॅन्डींग पॉइन्टस्) अभ्यास करण्यासाठी नेमलेल्या समितीने जलयाने उतरविण्याच्या जागा (लॅन्डींग पॉईन्टस्) व जलवाहतूकीसाठी जेट्टीकरिता योग्य जागा

आणि अशा जागांचे सर्व्हे नंबर निश्चित केले आहेत. या समितीच्या अहवालाला व शिफारशींना शासन निर्णय,क्रमांक : एसएएन १०९५/सीआर-१८/परि.४ , दिनांक १७ मे १९९७ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यापैकी काही जागा निश्चित करण्यात आलेल्या आहेत. तथापि, काही तांत्रिक कारणांमुळे अशा जागांमध्ये बदल करावा लागला तर जमीनी वर्ग करण्याबाबतचा शासनाने घेतलेला धोरणात्मक निर्णय अशा जागांना देखिल आपोआप लागू होईल व त्यासाठी नव्याने मंजूरी घेण्याची आवश्यकता राहणार नाही.

(१५) जलवाहतुक प्रकल्पासाठी आवश्यक असणा-या पायाभुत सुविधा उदा. पोचमार्ग, पाणी पुरवठा ,वीज,सांडपाणी व्यवस्था आणि वाहनतळ इ. संबंधित स्थानिक संस्था जसे मुंबई /ठाणे/नवी मुंबई महानगरपालिका किंवा विकास प्राधिकरण जसे सिडको,मुंबई महानगर प्रादेशिक विकास प्राधिकरण यांनी उपलब्ध करुन द्याव्यात व त्यासाठी आवश्यक ती तरतूद विनिर्दीष्टपणे त्यांच्या अर्थसंकल्पात करावी. अशा सुविधा वेळेच्या आत पूर्ण करुन देण्याबाबत अशा संस्था /प्राधिकरणे यांनी निश्चित हमी द्यावी. तथापि, त्यांना यासाठी राज्यशासनाकडून नियतव्यय उपलब्ध करुन दिला जाणार नाही.

(१६) जलवाहतूक सुरु करण्यापूर्वी संबंधित उद्योजकास अनेक विभागांकडून परवाने प्राप्त करावे लागणार आहेत. असे परवाने उद्योजकाला मिळवून देण्यासाठी संपर्क यंत्रणा म्हणून महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ Nodal Agency म्हणून कार्य करेल.

(१७) नौकानयन मार्ग महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाच्या सल्ल्यानुसार महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून अधिसूचित करण्यात येतील.

(१८) जेट्टीसाठी आणि प्रवासी सुखसोईसाठी आराखडे हे संबंधित उद्योजकांकडून महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास सादर केले जातील व त्यास महामंडळाची मान्यता मिळाल्यानंतर संबंधित नियोजन प्राधिकरणाकडून त्यास मान्यता मिळविण्याची जबाबदारी अशा उद्योजकांची राहिल. अशी जेट्टी बांधताना ती भविष्यामध्ये मालवाहतूकीसाठी वापरता येईल अशा दृष्टीने अशा जेट्टींचा आराखडा राहिल.

(१९) या प्रकल्पाअंतर्गत जलमार्गासाठी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने अधिसुचित केलेल्या नौकानयन मार्गातील गाळ काढण्याचा भांडवली व आवर्ती खर्च हा सवलतीच्या संपूर्ण कालावधीमध्ये उद्योजक करेल. गाळ काढण्याबाबतच्या तांत्रिक सुचना महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडुन दिल्या जातील व उद्योजक त्यांचे पालन करील.

(२०) यशस्वी उद्योजकाने अशारितीने बांधलेल्या जेट्टीच्या आकार हा त्या उद्योजकांकडून निश्चित केला जाईल तसेच अशा जेट्टीचा वापर करण्यास इच्छुक असणा-या इतरांकडून जेट्टीच्या वापरासाठी काय आकार घ्यावा हे ठरविण्याचे अधिकारही अशी जेट्टी बांधलेल्या उद्योजकालाच राहतील. सवलतीच्या कालावधीत अशा त-हेची सुविधा निर्माण करण्यासाठी इतर स्पर्धकांना परवानगी दिली जाणार नाही याची हमी शासन देईल.

तथापि यशस्वी उद्योजकांनी बांधलेल्या जेट्टीचा वापर मालवाहतुकीसाठी सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रमे व राज्य शासनाला करता येईल व त्याबाबत उद्योजक सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रमांकडून योग्य तो आकार घेऊ शकेल. परंतु राज्य शासनाकडुन मात्र याबाबत कोणतेही भाडे अशा उद्योजकाला आकारता येणार नाही.

(२१) सवलतीच्या कालावधीत पायाभूत सुविधा विकसित करणा-या व जलवाहतूक करण्या-या उद्योजकाला जलप्रवासी वाहतूकीसाठी देण्यात आलेल्या मार्गावर त्या उद्योजकांना जलप्रवासी वाहतूकीसाठी एकाधिकार राहिल. जलप्रवासी वाहतुकीसाठी आकारावयाच्या भाडयाबाबत वाद निर्माण झाल्यास ती बाब लवादासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांचेकडे सोपविण्यात येईल व त्यांचा निर्णय अंतिम व संबंधितांवर बंधनकारक राहिल.

(२२) खाजगीकरणातून " बांधा,मालकी,वापरा व हस्तांतरीत करा " (BOOT) या तत्वावर करण्यांत येणा-या जलवाहतूकीच्या प्रकल्पाना सवलतीच्या कालावधी तीस वर्षे राहील व हा कालावधी बंदर विकासाच्या शासनाच्या धोरणानुसार वाढविता येईल. सवलतीच्या कालावधीबाबतचा देकार तीस वर्षापेक्षा कमी अवधी करीता उद्योजक देऊ शकेल आणि उद्योजकांची निवड करताना असा कालावधी एक निकष राहिल.

(२३) सर्व कायदेशिर परवाने प्राप्त झाल्यानंतर यशस्वी निविदाकार उद्योजकांने जल प्रवासी वाहतूक ही करार केल्या पासून दोन वर्षाच्या आत सुरु करावी. अन्यथा करारान्वये दिलेल्या सर्व सुविधा आपोआप ताबडतोब रद्द होतील व निविदाकार उद्योजकाचे सर्व अधिकार आपोआप ताबडतोब नष्ट होतील.

(२४) उद्योजकांकडुन आकारावयाचे भाडे ,प्रवासी कर इ. वसुल करण्याची जबाबदारी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाची राहील.

(२५) सदर प्रकल्प उभारणीकरीता महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड ,महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास संपूर्ण सहकार्य देईल.

(२६ ) महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ या प्रकल्पाकरीता एका तांत्रिक सल्लागार समितीची ( Technical Advisary Committee ) ची स्थापना करेल. महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाचा एक प्रतिनीधी या समितीचा सदस्य असेल.

(२७ ) या प्रकल्पाकरीता गृह ( बंदरे ) विभाग प्रशासकीय विभाग( Administrative Department ) म्हणून कार्य करेल.

(२८) शासनाच्या जलवाहतुकीच्या धोरणाच्या अधिन राहुन अटी व शर्तीमध्ये बदल करण्याचे समन्वयन विभागास अधिकार असतील.

## अनुसुची " अ"

दि.१४ जुन १९९९ च्या शासनाचे जलवाहतुक धोरण निश्चित करणारा शासननिर्णय आणि महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने तयार केलेले निविदा प्रपत्र यामध्ये शासनधोरणाच्या बाहेर जावून केलेले बदल पुढीलप्रमाणे :-

(१) शासननिर्णयामध्ये असे नमूद केले आहे की विकासकाकडुन प्राप्त झालेल्या निविदांचे मूल्यमापन करताना उद्योजक शासकीय जमीनीचे भाडे किती देणार आहे आणि शासकीय जमीनीच्या सवलतीचा किती कालावधीसाठी मागणी करीत आहे हा निकष राहील.

**बीड डाक्युमेंटमध्ये हा निकष क्रिसिल ॲडव्हायझरी सर्व्हिसेसच्या सल्ल्यानुसार वगळण्यात आला असून पात्रतेचे आर्थिक व तांत्रिक निकष स्वतंत्रपणे निश्चित केलेले आहेत.**

(२) दिनांक १४ जून, १९९९ च्या शासन निर्णयामध्ये उद्योजकांना फक्त जेट्टीसाठी लागणारी जमिन विनामूल्य देण्यात येईल आणि प्रवासी सुखसोयी उदा. प्रतिक्षागृह, वाहतूक नियंत्रण कक्ष इत्यादी करिता लागणारी जमिन उद्योजकांना भाडेपट्टीवर दयावयाची आहे.

**तथापि, Bid Document नुसार शासनाकडून ज्या नाममात्र दराने म.मे.बोर्डास जमिन उपलब्ध करून देण्यात येणार आहे त्याच दराने ती उद्योजकांना देण्यात येणार आहे.**

(३) शासन निर्णयानुसार सवलतीच्या कालावधीमध्ये उद्योजकास जलमार्गाचा एकाधिकार देण्यात आला आहे.( मुद्दा क्र.१६)

**तथापि, Bid Document नुसार उद्योजकांना सुरवातीच्या पाच वर्षांकरिता जलवाहतूकीचा एकाधिकार देण्यात आला असून सेवेचा दर्जा समाधानकारक आढळल्यास हा कालावधी पुढील पाच वर्षांकरिता वाढविण्यात येईल अशी तरतुद आहे.**

(४) शासन निर्णयामध्ये अशी तरतूद आहे की, जेट्टीचा वापर माल वाहतूकीसाठी शासनास विनामूल्य करता येईल व सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रमांना योग्य तो आकार घेऊन उद्योजक त्यांना माल वाहतूकीसाठी परवानगी देईल.

**Bid Document याबाबत कोणताही उल्लेख नाही.**

(५) शासन निर्णयानुसार BOOT कालावधी ३० वर्षाचा असून निविदाकार सवलतीच्या कालावधीपेक्षा कमी कालावधीसाठी देकार देऊ शकेल आणि उद्योजकाची निवड करताना हा असा कालावधी एक निकष राहिल.

**निविदाप्रपत्रानुसार सदर कालावधी किमान २० वर्षांचा असुन तो ३० वर्षापर्यंत वाढविण्याची तरतुद आहे.परंतु हा निकष असणार नाही.**

(६) जकात कर/ विक्रीकर याबाबत सवलती सुट देण्याचा शासननिर्णयामध्ये **उल्लेख आहे.**
**निविदाप्रपत्रामध्ये याबाबत उल्लेख नाही.**

(७) काही विशिष्ट परिस्थितीमध्ये करार Terminate झाल्यास निविदाकारास नुकसान भरपाई देण्याची **शासननिर्णयामध्ये** तरतुद नाही.

**परंतु निविदाप्रपत्रामध्ये अशी तरतुद करण्यात आली आहे**

## प्रपत्र "अ"

### जलवाहतूकीसाठी निवडलेल्या जमिनीची यादी

| स्थळ | भू.क्र. | क्षेत्र |
|---|---|---|
| १.एन.सी.पी.ए. लगत | | ४०,००० वार |
| २. बांद्रा | सी.एस.टी.क्र.११५२ | सर्व क्षेत्र |
| ३. जुहू | सर्वे नंबर दिलेला नाही. पालम ग्रोव्ह हॉटलच्या पुढे आणि हॉलिडे इन हॉटलच्या मागील बाजूर ट्रायटॉन एजन्सीने वापरलेल्या दोन जागा: | सर्व क्षेत्र |
| ४. वर्सोवा | सी.एस.टी.क्र.१२७६ (सोबत नकाशा जोडलेला आहे) | पायाभूत सुविधांसाठी ३००० चौ.मी. जर कॅटमेरॉन सर्व्हिस सुरु झाल्यास ३००-४०० चौ.मी.क्षेत्र तयार करावे लागेल. |
| ५. मार्वे | सी.एस.टी.क्र.९४१० | १०,००० चौ.मी. |
| ६. चारकोप | सी.एस.टी.क्र.४४ व ४४ | अंदाजे १४ १/२ एकर क्षेत्र |